# प्रस्तावना—

या काव्यसंग्रहातील बहुतेक कविता अगोदर प्रसिद्ध झाल्या आहेत. तेव्हां वाचकांस त्या पूर्वपरिचयाच्या वाटतील अशा कल्पनेनें या संग्रहास " ओळखीच सूर " हें नांव मला द्यावेसें वाटलें स्फुट कविता संकलित करताना त्यांचा अनुक्रम स्वैर लावणें अपरिहार्य होऊन बसतें. तथापि थोडी विषयसंगति रहावी म्हणून एका विषयाशीं संबंध ठेवणाऱ्या ज्या अनेक कविता असतील त्या एकत्र याव्यात अशी योजना केली आहे.

काव्य म्हणजे काय? हा प्रश्न वादग्रस्त आहे. विशेषत: काव्य म्हणजे जीवनमीमांसा या पाश्चात्य मतानें बरीच खळबळ उडवून दिली. वापरणारानें 'जीवन' हा शब्द विशाल अर्थी वापरला आहे. जीवन म्हणजे फक्त आजचें जीवन, वा साम्यवाद इ. आजचेच प्रश्न असा त्याचा संकुचित अर्थ घेण्याचें कारण नाहीं. तो तसा घेऊं नये असें खुद्द त्या मताच्या उत्पादकानेंच बजावून सांगितले आहे. तथापि जीवनाचा असा संकुचित अर्थ घेतल्यानें काव्याच्या हेतुविषयीं पुष्कळांची विनाकारण गैर समजूत झालेली आढळते. काव्याची जीवनाशीं सांगड घालण्याच्या भरात काव्य हें निवळ मतप्रसाराचें साधन होऊं लागलें आहे. काव्याचा, किंबहुना, ललितवाङ्मयाचा आद्य हेतु आनंदनिर्मिति हा व एवढाच होय. ललितवाङ्मयामुळें एखादेवेळीं सहजासहजी मतप्रसार देखील साधूं शकेल पण असें असलेंम्हणून मतप्रसार हें त्याचें मूळकार्य आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं. सौंदर्य नि सुगंध यामुळें गुलाब

सगळ्यांचा लाडका झाला आहे. गुलाबापासून गुलकंद देखील तयार होऊं शकतो. पण गुलकंदासाठीं का बागेंत आपण गुलाब लावतों? अशी व्यावहारिक दृष्टि ठेवायची झाली तर गुलाबापेक्षां कोबीची लागवड करणे अधिक फायदेशीर ठरेल! पण ही दृष्टी भाजीवाल्यास पटली तरी रसिकास कशी पटावी?

नुसत्या आनंदासाठीं काव्य लिहिलें तर त्याचा उपयोग तरी काय? असा प्रश्न करण्यात येतो. असे विचारण्याचें कारण आनंद हें साध्य नसून साधन आहे अशी पृच्छकाची समजूत झालेली असते. त्याची दृष्टी आनंदेतरवस्त्वपेक्षी असते. सांसारिक गरजा भागविण्याच्या कामीं काव्यानंदाचा कांहींएक उपयोग होऊं शकत नाहीं ही गाष्ट अगदीं निर्विवाद आहे. नुसता आनंद पुरेसा वाटत नसेल तर काव्य निरुपयोगी आहे असें म्हणण्यास काहीच हरकत नाहीं. सौंदर्यनिर्मिति हा काव्याचा आद्य हेतु असल्यानें ज्यातील अर्थ रमणीय आहे असें कोणतेही लेखन—मग ते ध्येयपुरःसर केलेलें असो वा नसो - काव्य या नांवास पात्र आहे.

रमणीयतेची कसोटी काय तें मात्र नक्की सांगता येणार नाहीं. त्यासाठीं रसिकांच्या मनालाच प्रश्न करावा लागेल. असो.

या संग्रहाचे प्रकाशक श्री. त्रिंबकराव माईणकर यांचा मी खचित आभारी आहे. युद्धजन्य परिस्थितींत पुस्तकप्रकाशनाचें काम अतिशय दुष्कर झालें असतानांहीं त्यांनीं तें उत्साहाने स्वीकारलें ही गोष्ट त्यांच्यात वसत असलेल्या साहित्यप्रेमाचें द्योतक आहे असें मी समजतों.

रा. अ. काळेले.

## —: अनुक्रमणिका :—



[ कवितांची नांवें अक्षरानुक्रमानें घातलीं आहेत. ज्या अनुक्रमानें कविता पुस्तकात घातल्या आहेत त्या अनुक्रमाचा अंक नांवामागें दिला आहे. नांवांच्या पुढचा अंक पृष्ठाचा. ]

## १-ओळखीचे सूर- … … … [ विद्युल्लता ]

हे सूर ओळखीचे यावेत कोठुनी ?
ऐकून हर्ष वाटे, ये ऊर दाटुनी !

हा मन्त्र फुंकला का ? हाले न पाउल !
राही न भान काही, झालीच उन्मनी !

अन्धूक चान्दणें हें, अन् शान्त शर्वरी
वाऱ्यावरून येती हे सूर वाहुनी ।

हा साध, आसमन्तीं उत्फुल्ल बाग ही,
या जादुनें पुरी ही गेलाच भारुनी ।

हे सूर गोड आहा, ऐकून या जिवा—
ये रङ्ग अन् तरंगे सुस्वप्न मन्मनीं !

ती रात्र आठवे, तें विश्रम्भमीलन,
ते फोल बोल तूझे गे, मञ्जुभाषिणी !

मोहात घालणारे ते-तेच शब्द हे
मच्चित्त लोभणारी ही तीच रागिणी

गा—गाच—गात राही तूं ओळखी न वा
मी मात्र ओळखीले तुज जादुगारिणी !!

इंदूर. २७-४-३८.

महाराष्ट्र शारदा मे १९३८.

## २—चाहूल— ... ... [ देवद्वार ]

नीरव निशेच्या उदरात खोल
साजणा, चाहूल तुझी लागे !

निरभ्र अनन्त अवकाशीं राजसा,
चाहूल सहसा, तुझी लागे।

निःशब्द गम्भीर सागरीं प्रेमळा,
चाहूल रे, मला तुझी लागे !

विचरता रानीं विजनीं सर्वथा
चाहूल रे नाथा, तुझी लागे !

निवळता ताप, मावळता व्याप
नेत्र आपोआप झाकतां हे—

अगा हृदयेशा हृदयाच्या तळीं
चाहूल जवळीं तुझी लागे !

इंदूर.
११-४-४१.

## ३—हाक— . ... ... [सुनीत]

देसी हाक मला सख्या जिवलगा, येऊन ऐशा निशीं
काळोखात गभीर मी निकट रे, येऊं परन्तू कशी ?

ऐकूं ये तव शब्द, मात्र दिससी डोळां न कोठें मला
तूं आहेस इथेंच ना ? तुज कुठें शोधूं बरें प्रेमळा ?

देसी हाक दुरून कां ? त्वरित ये-ये सन्निधीं साजणा !
मी येण्यास अधीरलें, पण तिथें येऊं कशी, सांग ना ?

अन्धारात अशा अशापरि नको खेळूं लपंडाव रे
आले मी तुज सर्वथा शरण, ही थट्टा खट्याळा, पुरे !

देसी हाक, तसाच हातहि तुझा दे शीघ्र नाथा, मसी
ही दासी तुझि हाक ऐकुन पहा धावून आली कशी !

इंदूर
२१-१०-४०.

स्त्री-जानेवारी १९४१
यशवंत—मे १९४१

## ४—पूर्णिमा— . ... ... [ शा. वि ]

आहे ही किति रम्य वेळ !
—उगवे पूर्णेन्दु पूर्वे अहा !
ही राई घननीळ, हें कुरण, नी मोठा नदीकाठ हा !
सारे शान्त असे—
परन्तु उठतें माझ्या मनीं काहुर,
बैसे ध्याननिमग्न मी हनुवटी टेकून हातावर।
एथें या विजनांत रात मधुरे, ही गोड जाई सुनी
का बेचैनित ऐन हें वय असें जावें सुनें सम्पुनी ?
त्या इच्छा अपुऱ्या,
—अपूर्ण वचनें,
होणार केव्हां पुरीं ?
मी चण्डोल अतन्द्र, चन्द्रवदने ये !
—पूर्णिमा तूं करी ! !

इंदूर
१४-११-४०.

## ५—कुणीतरी— . . ... [ देवीवर ]

कुणीतरी गाईयलें । गीत सुन्दर सुस्वर
ऐकोनीया चित्त माझें । गेलें मोहून सत्वर

कुणीतरी ओवीयलीं । शुभ्र मोगऱ्याची फुलें
गोड दर्वळे आमोद । हर्षें माझें चित्त भुले

कुणीतरी कुंचल्याने । दिले भरोनिया रङ्ग
रम्य चित्र तें पाहता । चित्त माझें झालें दङ्ग

कुणीतरी जिव्हाळ्याच्या । चार जुळविल्या ओळी
वाचुन त्या कण्ठ दाटे । आसवें ही पूर आलीं

कुणीतरी पुण्य केलें । रूप तुझें हें उदेलें
गाठ पडे अवाचित । आणि चित्त वेडें झालें !!

इंदूर
३-१२-४०.

यशवंत
जानेवारी १९४१.

## ६—मनीषा— ... ... ... [ सुनीत ]

जऱ्हां उन्नत अस्तशैलशिखरीं विश्राम घ्याया क्षण
ठेवी टेकुन ताम्रबिम्ब अपुलें आदित्यनारायण।

जेव्हां गे, चमके विलोल पहिली ती प्रीतिची तारका
(वाटे पश्चिमदिग्वधूनयानिं हा प्रेमाश्रु आला न का ?)

जेव्हां आत उठून भावलहरी सोत्कण्ठ ही कोकिळा
लावोनी स्वर उंच पञ्चम करूं लागे गळा मोकळा।

जेव्हां ही लव लाल पिङ्गट अशी अस्पष्ट संधिच्छटा
टाकी व्यापुन आसमन्त उठुनी जादूपरी दिक्पटा।

गे, तेव्हा मज वाटतें तव उरीं टेकून माझे शिर
दृष्टी रोखित सारखी सखि, तुझ्या स्नेहार्द्र नेत्रांवर—

गाणें गोड तुझें अहा, मग गडे गे, ऐकतां ऐकतां—
झाकावेत हळूहळूं नयन त्या आनन्दिं हिन्दोळतां !!

इंदूर
२४-३-३८

मनोहर
आगस्ट १९३८

## ७—स्मृति— … … .. [सुनीत]

आतां तीं नुरलीं सुमें न उरल्या त्या मञ्जिऱ्या साजिऱ्या
नाहीं त्या लतिका, न जीवन उरे त्या आटलेल्या झऱ्या।

हौसेनें मजसाठि तूं निजकरी जी लाविली प्रेमलें,
ती गेलीच सुकून बाग ! न दिसें काहींच गे त्यांतलें।

आता मी फिरकूं कशास तिकडे ? पाहूं तरी ढुंकुनी ?
नाही आठविणार वाटहि मला की ही कशी कोठुनी।

तेंही मी पुरतेपणीं विसरलों कीं काय होतें कुठें
कोठें मण्डप जाइचा, जुइ कुठें, होती चमेली कुठें

आहा ! आठवतें परी-मज दिला चाफा नवा तूं सखी,
मी हासून म्हणे-" गुलाबच मला हा आवडे ! „—आणखी

—गालीं अल्लदशी दिलीच टिचकी-तूं पाहिलें खालतीं !
ही येता स्मृति झाकती नयन ! ये बाष्पौघ त्यासंगतीं !!

जावो बाग वठून ती-परि गडे माझ्या मनीं सर्वदा
—ती तैशीच खुले, फुलें फुलति, तो वाहे झरा गद्गदां !!

कन्नोद }
१६-१०-३५. }

{ किर्लोस्कर
{ १९३५.

## ८—नवा रुमाल— ... ... [ वसन्ततिलका ]

माझा सुरेख निरखून नवा रुमाल
तूं घेतलास चट ओढुन तो खुशाल

आणी कुपीमधिल शिम्पुन ' दिल्‌बहार '
(छे! प्रीतिचाच तव तो गमला बहार!)

---घालून सुन्दर घडी त्रिदळासमान
माझ्या खिशात मग ठेवित तो जपून

हासून बोललिस "तुम्हि कवी असाल-
तुम्हां कळे न परि वापरणें रुमाल!"

अद्याप तो मधुर वास तसाच राहे
आता कुठे पण तुझा सहवास आहे?

तो गन्ध मादक अजून भरे —न खोटें-
त्वत्प्रीतिचा परि नुरे मुळि गन्ध कोठें!!

इंदूर
१९-५-४०.

मनोहर
आगस्ट १९४०

# ९–तूं गेलीस–पण–

तूं गेलीस, परी इथें विसरुनी गेलीस हातातला—
तो गुल्जार गुलाबगेन्द (धरि जो त्वन्माधुरीशीं तुला)

तो आणून दिला तुला परत मी, साभार तूं घेतला
झालें ठीकच हें, परी मग असें हें काय व्हावें मला ?

कां अस्वस्थपणा जिवास ? इतके कां चित्त उत्कंठिलें ?
सांगूं ?–त्या सुमनासवेंच मनही हातीं तुझ्या अर्पिलें !

तत्पूर्वीं नव्हतीच ओळख, कधीं झाल्या न भेटी पुन्हां,
गेला काळ किती ! परी मज न हा वृत्तांत वाटे जुना

गे, अद्याप गुलाबगेन्द मजला दृष्टीस जेव्हां पडे
ये, रोमाञ्च नि आतुरे मन, जणूं गेलें पुन्हां सापडे !!

इंदूर
१३-२-३९.

कला, जून १९३९
ज्योत्स्ना, फेब्रुवारी १९४०

## १०—अपुरा शृङ्गार— ... ... [ वसन्ततिलका ]

ऐन्यासमोर जुळवून समग्र साचें
साहित्य सुन्दर असें मुखमण्डनाचें

न्हाया सुसज्ज बसली स्मितयुक्त बाला
झाला खरा प्रहर–थाट परी न झाला

अद्यापही मनपसन्त न भाङ्ग आला
कीं चर्चिलें न बरेंव हिम आननाला

कीं लाविली न मुखपूड मुखा विलोल
ओठीं छटा भडक रंगविली न लाल

आहे तशीच पडली फुलवेणि साची
झाली नसे निवड सुन्दर पातळाची

तो तोंचि ये नि दृढ घेत तिला धरून–
बोले हसून –"किति तूं दिसतेस छान !"

शृङ्गार यद्यपि तिचा अपुराच झाला
आला तदीय तरि हेतु पुरा फळाला !

इंदूर
५-११-४०.

झारापकर.
जानेवारी १९४१.

## ११–होय ना ?– ... ... ... [मिश्र आनंद.]

कां आज हें निराळें कांहीं घडे न जें झालें ?
का वृत्ति गोन्धळे ही ? कां ऊर काहुरें हाले ?

कां आज बोलताना य शब्द कापरा तुझा ?
दृष्टीवरून माझ्या कां नेत्र पातले खालें ?

निश्शंक आजवेरी गोष्टी किती बरें केल्या ?
तो शब्द टाकण्याला मच्चित्त मात्र गे, भ्यालें।

प्रीती मुखें फुटे ना, रोमीं उठे हृदीं स्पन्दे–
नेत्रीं भरून राही, आकण्ठ ये, नि घोटाळे !

आश्चर्य गे परन्तू ! कीं तें मनातलें गूढ–
शब्दीं न सांगताही कैसे कळोनिया आले ?

नावेक डोळियांनीं माझ्या विचारलें–"हो ना ?"
आणी अचूक तूझ्या गालीं खुलून–"हो" आलें !!

इंदूर. 5-10-39.

ज्योत्स्ना. एप्रिल 1940.

## १२–स्वप्न– ... ... ... [सुनीत]

स्वप्नीं मी तुज पाहिलें प्रियसखी, मत्सन्निधीं येउन
बाहूंचें अपुल्या स्वयें मम गळा तूं घातलें बन्धन,
भाळीं बारिक कुंकुमांक तुझिया शोभा मुखा दे अती
आणी दङ्ग करी त्वदङ्गि रचिली जी चन्दनाची उटी,
श्यामस्निग्ध विदग्ध केशरचना होती तुवां कल्पिली
साजे ती मृदुगन्धि कुन्दकळिची वेणी वरी घातली।
माझी आवड जाणुनीच हिरवें ल्यालीस तूं पातळ
ज्यायोगें उठते विशेष खुलुनी कान्ती तुझी निर्मळ।
लावोनी अनिमेष लोचन तुझे मन्नेत्रि बाष्पान्वित
"आहे मी तुमचीच!" हें वदुनि तूं केलेस मन्दस्मित।
ती चित्तीं स्मरतां अजूनहि तुझी वाटे खरी वैखरी!
तें का स्वप्न असें म्हणून अवघें मानूं वृथा सुन्दरी?
तो मिथ्या अनुरागबन्ध, लटके ते गोड तूझे वच,
भ्रान्तीचे दिन ते —न तेंहि तरि का होते असे स्वप्नच ?

कन्नोद
८-७-३६.

मनोहर
आक्टोबर १९३६.

## १३–तुझा फोटो– ... ... ... [जलौघवेगा]

मला तुझा तूं दिलास जो तो--
कमू, असे हा अजून फोटो।

बघूं किती! देइ हा न थोडी-
जुन्या स्मृतीची नवीन गोडी!

तयावरी स्वाक्षरी दिली तूं--
"सदैव तूझी–कमा" परन्तू –

न ये तुला आज आठवाया
करी तुझी जें कबूल छाया।

दिलेंस हें आवडी मला जें
कमू, हुबेहूब चित्र तूझें।

सुरेख गालावरील पाही
उणा न बारीक तीळ तोही!

न यात आहे (न राग मानी)
तुझ्यातली–फक्त–बेइमानी!

इंदूर
१४-७-४०.

ज्योत्स्ना
सप्टेंबर १९४०.

## १४–मुकी कबुली– … … … [सुनीत]

वाटेनें पुढतीं अचानक अशी येता तुला पाहुनी
आलों मी जवळीं नि हासत उभी केली दुचाकी झणीं।

हें आश्चर्य खरें! "कमा-कमल-तूं-तुम्ही इथें? ठीक ना?"
मच्चित्तात उडून गोन्धळ मुखें ये शब्दही नीट ना!

थोराची, परकीय तूं, सलगिचे कैसें अतां बोलणें?
छे छे-सर्वच तें हवें विसरण्या झालें नि गेलें जुनें।

मानेनेंच करून हें विशद कीं, "आहे बरें चाललें"
माझा घेत निरोप हास्य सहजी केलेंस तूं कोमले

तें होतें परि हास्य ना तव, कुठें उल्हास त्याच्यातिल?
कोठ मुग्ध खुळेपणा, नि भलतें चांचल्य तें मिष्किल?

काहीं गूढ असें करी स्फुट तुझ्या हास्यातली खिन्नता
जें ये ना गिळतां, न ये विसरतां, किंवा न ये बोलतां।

तूं काहीं म्हण, हीच साफ कबुली देती तुझे लोचन
कीं "मी तीच अजूनही तुजकडे हा जीव ओढे–पण––"

इंदूर
२४-३-३९.

ज्योत्स्ना (खास अंक)
मे १९३९

## १५–वाटेंत– ... ... [ कलावती ]

समोर मार्गि मला पाहुनीच येतांना
वळेंच बाजुस तूं रोखिलेंस नेत्रांना।

कितीं समीप तुझ्या हेतुतां निघालों मी
क्षणैक हालविलें अन् हसून ओठांना।

वळून किंचितसा थांबलोंहि सापेक्ष
परी न माहितसें दाविलेंस जाताना।

निघून गेलिस तूं रूपगर्विते, नीट
नसेंच ओळखही आपली जणूं माना।

परंतु, सांग बरें, जाहलों न जों दूर
हळूंच पाहियलें तों वळून कां कोणा ?

मनात मानिनि गे, सत्य जाणसी सारें
खरें कबूलं नये हाच कीं तुझा बाणा ?

इंदूर
१८-७-३८.

मनोहर
डिसेंबर १९३८

## १६–कोण ही ? ... ... .. [ शुभकामी ]

हातात जनानी धरि झोकात दुचाकी
डोळ्यात भरे अल्लडशी धीट लकाकी ।
विस्तीर्ण तनू भाग गळ्याभोंति खुलाच
जाणून असा हा उघडा बाहु न झांकी ।
ही गौर हिमप्राय नवी काय तजेल
'अफ्गाण' मुखीं वाढवि घोटीव तकाकी ।
पाठीवर वेणी नच, नागीणच काळी
चावा जणु घ्याया टपली दुर्मतिचा कीं !
साजे मणिबंधीं सुघडें सान घड्याळ
हीं कर्णफुलें मारिति बेफाम चकाकी ।
हें पातळ, ही झक्पक न्यारीच किनारी
अन् चप्पल पायीं, मुळिं थाटात न बाकी !
चाले हम रस्त्यावर ही वर्दळ कोण !
वेगात दुचाकी चतुरा त्यातुन हाकी ।
ही कोण अशी पोर ? हिची थोर धिटाई !
कोणास बरें दर्शनलोभात न टाकी ?
स्त्रीरूप फिरे ही तर ग्वाहीच नव्याची
जी मार्ग पुढें उन्नतिचा निर्भय आखी !
जे थांबति, घोटाळति, रेंगाळति जातां—
निर्बुद्ध मधें, त्यांस म्हणे, "बाजुस व्हा कीं !"

इंदूर. २२-११-३८. ] [ मनोहर, एप्रिल १९३९

## १७—कुशलातलें कौशल्य— . ... .. [सुनीत]

“मन्दा? ओळखिलें न मी मुळिं तुला! अन् ओळखावें कसें?
माझी होतिस बाळसोबतिण तूं, तें चित्र चित्ती वसे

नुक्ती मी तुज पाहिली चिमुरडी! आश्चर्य वाटे मना,
पोरींची तर जात, काय म्हणती-वाढे तशी! होय ना?

“आतां थाट पुसूं नका! तलमसें बिन्कास हें पातळ
तोरा काय दुचाकिचा! झळकती हे डूल चन्द्रोज्वळ

ताजे गेन्दगुलाब दोन खुलती कैंवी चकड्यांत हे!
वाटे ‘काननदेवि’ बोलपटसम्राज्ञीच! थट्टा नव्हे—

“हीं पाहूं कसली बुकें?—‘नृपसुता’— ‘तुम्हा जसें आवडे’
इन्टरला बसणार हो? तर तुझी शाबास मन्दा गडे!

यन्दा काय म्हणे — असो, पण तुझें आहे बरें चाललें?
माझें काय विचारतेस! दुबळे तारूं समुद्रातलें—

हा हा, पारधिणी! अमोघ अपुल्या विन्धून तूं दक्शरें
घायाळास विचारसी कुशल, हें कौशल्य आहे खरें!”

इंदूर.
मे १९४०

ज्योत्स्ना.
जून १९४०.

## १८–दुःसह भार– ... ... [ भूपतिवैभव ]

हा असा कोठवर वाहत जाणें भार ?
साहती जिवाला या न यातना फार !

हें दुबळें गाडें अतिभारानें वाके
करकरति चालतां ओझ्यानें ही चाकें !

हा मध्याह्नीचा शिरीं तळपतो भानू
हे एकामागुन एक उठति गिरिसानू !

निष्पर्ण वृक्ष हे निर्जळ सारा देश !
किति ओढत जाणें तरि कोसावर कोस ?

श्रान्त हे भ्रान्तिनें वृथा खुळावति डोळे,
हें अखेर वाटे ठिकाण आलें आलें,

तो चट्कन् आणी भानावर आसूड !
टोचणी मारुनी डंखचि उगवी सूड !

"तो बैल कष्टुनी गाडा ओढत जाय,
तो रेडा वाही भार पर्वतप्राय,

मजपरी दिनभरी तेहि साहती चटके,
पाठीवर त्यांच्या अविरत बसती फटके।

परि साञ्जेला धनि घालुनि चारादाणा
चुचकारि, वाजवी शीळ, थोपटी त्यांना

गोंजारी मायें हातांनीं हळुवार—
त्या भाग्याचा मज वाटे हेवा फार!

प्रीतिचा शब्द मज ऐकुं येइना कोठें!
अप्रीतिचेंच हें रान माजलें मोठें!

हा असा कोठवर वाहत जाणें भार?
नाहींच यायचें का विश्रान्तिद्वार?

कन्नोद
१८-५-३७.

महाराष्ट्र शारदा १९३७
स्त्री, नोवेंबर १९३७.

## १९–घरीं आल्यावर– ... ... . [ शा. वि. ]

मी दारात न टाकलेहि पुरतें पाऊल जों आपलें
तों आधींच अधीरुनी तुजकडे हासून गे, पाहिलें
रागाने तिरपा कटाक्ष नुसता तूं सुंदरी टाकिला
आणी विन्मुख होत एक झटका मानेस किंचित् दिला।
आलों मी जवळीं किती, बघितलें नाहीं परी तूं मुळीं
मी गे, वाटहि पाहिली किति, परी नाहींच तूं बोलली
प्रेमानें पुशिलें हळूंच मग मी—
"जोडी नवी ही तर आहे का तुजला पसन्त ?"
परि तूं नाहीं दिलें उत्तर।
"आहे आज नवी 'प्रभातकृति' अन् हे होत आले नऊ
जाऊं या तर का अजून दुसऱ्या खेळास आतां ?"
—"उंहूं !"—
"राहूं दे. कशि भूक लागली पहा, काहीं हवें खावया,
आधीं वाढ बघूं"
—"करील सगळें रामाच. सांग तया"—
—"जाऊं मी ?" —
—"मजला कशास पुसतां ?"—
—"कोणा विचारूं तरी ?"—
—"जीवाला अपुल्या !"—
म्हणून झणिं तूं गेलीस वाऱ्यापरी !

मीही मूढपणें तसाच पडलों बाहेर, ठावेंच ना—
कैसा, कोणिकडे, कशास, कुठुनी ! हिंडून आलो पुन्हा.

होता दीप सतेज, तूं पहुडली होतीस शय्येवर
होता एक उशास, आणिक दुजा होता उराशीं कर,

होता केशकलाप विस्कळित नी होतें तसें अंचल
होते ताम्र कपोल, आर्द्र गमले त्वन्नेत्रही पक्ष्मल,

होती ऊन तनू नि ऊनच तुझा निश्वासही वाटला
वाटे राग तुझा अजून टिकला, नाहीं जरा आटला !

वाटे जागवुं का ? अशीच असुं दे निद्रिस्त किंवा सुखें ?
होतें फारच भीत– आतुन परी मज्जीवही उत्सुके !

आलों सन्निध मी जपून, हलकें टेकून शय्येवरी
धैर्यें हात तुझा उरावरिल तो मी घेतला मत्करी,

तों त्यांतून गळून काहिं पडलें खळ्‌कन् असें खालतें,
होतें काय तरी ? अहा, जिवलगे ! माझे असे चित्र तें !!

इंदूर
२३-१-३९.

मनोहर (दिवाळी अंक)
नोव्हेंबर १९३९.

## २०—हे क्षण— ... ... ... [ शा. वि. ]

कोपाविष्टमनें कठोर वचनें स्वच्छन्दशीं बोलुनी
भ्रूभङ्गें मम अन्तरङ्ग अदये, गेलीस तूं भेदुनी

राही मौन परस्परात, वळली दृष्टी न माझ्याकडे
गेली ही घटका, परी न झटका अद्यापि गेला गडे !

देहाचें मम तूं प्रभुत्व अवघें अर्धाङ्गि, सम्पादिलें
स्नेहाचें परि मोल मात्र अजुनी नाहीं कसें जाणिलें ?

दैवें ही बिनमोल यौवनघटी स्वर्गीय जी पातली
जों झेलूंहि न, तोंच ती वितळुनी जाईल हातातली !

का हातामधलीं गुलाबकुसुमें हुंगायचीं टाकुनी
काटे आठवुनी मनीं कधि बरें वैषम्य आणी कुणी ?

प्रीती गोड, नुरे कडूपण पुरें प्रीतींत, हें जाणुन
घे, घे गे, अवघे अमोल पदरीं पाहून घे हे क्षण !

इंदूर
१९३८.

महाराष्ट्र शारदा
फेब्रुवारी १९३८

## २१–बन्दिवान– ... ... ... [कन्दर्प]

गे सुन्दरी, तुझ्या भरली लोचनांत दारू !
अत्यन्त मी पिपासु कसा मोह हा निवारूं ?

पीतां न होइ तृप्तिच, आकण्ठ दे ! पिऊं दे !
दे आणखी, नको जिवनावीण मीन मारूं !

मी धुन्दलों मला चढला कैफ या सुरेचा
नाहीं कह्यात जीव ! नको नेत्र तूं वटारूं !

मी स्वार बैसलों नवखा, आणि बेलगाम–
गे, आवरे न आवरतां हा अनङ्गवारू !

कीं मी अजाण नाविक, अन् तूं तुफानदर्या
मोकाट त्यांत मोकाललें मोडकेंच तारूं !

तूं जिंकिलेस, जिंकियलें, जिंकिलें मला गे !
कोणा करील ना वश हें इन्द्रजाल चारू ?

तूं स्वामिनी ! तुझा तर मी बन्दिवान झालों
दे जन्मठेप, सोडुं नको, होइ गे कृपाळू !!

इंदूर
१९-१०-४०.

यशवंत
मार्च १९४१.

## १३–तुज म्हणूं कुणासारखी ? ... ... [ घनराजी ]

"तुज म्हणूं कुणासारखी
"तुज तुला न दिसता कुठें, कुंठली मतीच, वाणी मुकी ! ॥ध्रु०॥

"तुज म्हणूंच सखि सांग, का
जशि नितान्त मृदु तारका ?"
"छे कलंक पातिला तिच्या केवढा ! न मी तिच्यासारखी !"

"तुज म्हणूच तर सांग, का
जशि सुरम्य मधुचन्द्रिका ?"
"छे, सदैव तिज लागला क्षय गडे ! न मी तिच्यासारखी !"

"तुज म्हणूंच मग सुन्दरी,
मृदु वसंतकमलापरी ?"
"छे, रुतून बसलें सदा पंकि तें ! न मी तयासारखी !"

"तुज मनीं जडविली अशी
म्हणुं तरी हिरकणी जशी ?"
"छे, नको ! भयंकर कठोर विष ती ! न मी तिच्यासारखी !"

"तुज म्हणूच मग सुंदरी,
सुखनिधान स्वर्गांपरी ?"
"छे ! मिळे न तो कधि जिवंतपणिं ! मी नसे तयासारखी !"

"तुज म्हणूच मग का खरी
मम विलोल कवितेपरी ?"
"छे, कुणाकुणाच्या पडे हातिं ती ! न मी तिच्यासारखी !"

"मग तुवांच वदणें, सखी
तुज म्हणू कुणासारखी ?"
"जरि म्हणाल मजला तरी, आपल्या म्हणा मनासारखी !"

इंदूर. यशवंत. ( खास अंक )

## २३–तिची श्रीमन्ती– ... ... [ भुजङ्गप्रयात ]

न लग्नास जों वर्षही एक झालें
तिला तोंच हा हन्त! वैधव्य आलें

न नातीं, न पैका, अशी निःसहाय
जगीं ती जगे एकटी दीन गाय

झटावें, खपावेंच चोवीस तास
मिळावे तधीं दोन पोटास घास

दशा कोण ही! झाकण्या अङ्गभाग–
तिला जाहलीं लक्तरेंही महाग!

महादू तिचा सान एकूलताच
तिला धीर तो काय हा एवढाच

परी द्वाड म्हादू न थोडा लबाड
शिकेना, टिकेना घरीं तो उनाड

सदा हातिं गोट्या, कधीं भोवराही।
पतङ्गात वा दङ्ग होऊन राही

कधीं ढीग गोळा करी जाहिराती
असा हिण्डतो स्वैर घेऊन साथी!

चहाड्या, चकाट्या, शिव्या, मारहाण
असे हाच म्हाद्यास धन्दा न आन

निखन्दून त्या बोलती लोक कैसे
तियेच्या जिव्हारीच तो घाव बैसे !

महादूच आशा तिची एकमेव--
सहारा, नि तोही असा ! काय दैव !

मनीं ती म्हणे, " हा बरा जीव जाता !
न हें सोसवे जन्मदारिद्र्य आतां ! "

परी रात्र होतां जधीं स्नेहपूर्ण
फिरे हात तीचा महादूवरून

तधीं त्या गमे माउलीला, अहो, कीं—
तिच्याएवढें कोण श्रीमन्त लोकीं ?

इंदूर
२९-३-३९.

स्त्री.
जून १९३९

## २४—तें फूल—हें फूल— ... ... [ उपजाति ]

तें फूल हासून नभीं विलोकीं
त्याच्यावरी तो दव देव टाकी

हें फूल चित्तीं प्रभु आठवून
टाकूं बघे त्यापदिं अश्रु दोन

तें फूल वांचे घटकाच पाही
त्या जीवनीं तें परि धन्य होई

हें* फूल दीर्घायु सहे बिचारें
कण्टाळवाणें परि शून्य सारें !

विकासवाया कळि त्या फुलाची
सन्ध्या नभीं रंगत सोनियाची

याला मिटायास नितांत मात्र
सदाहि मध्यान्ह—सदाहि रात्र

तें फूल माङ्गल्याचि मूर्तिमन्त
हें फूल ? हें पाप शरीरवन्त !

संसर्गही पावन होइ त्याचा
दूरून लोकांस विटाळ याचा

तें फूल मातीतुन वाढताहे
जाणार तें स्वर्गी खरें असे हें
हें फूल ये दिव्य असें वरून
जाईल मातीत परी मिळून !

तें फूल खालीं पडतां कुठेंही
सप्रेम लावी हृदयीं कुणीही
हें फूल कोणा हृदिं लागलेलें
कुठेंतरी व्यर्थ पडे गळालें

तें फूल संरक्षित ठेवण्यास
कांटे जणू कुम्पण कीं तयास
हें फूल मर्मातुन भेदण्यातें
या आतबाहेरुनि तीव्र कांटे

तें फूल आम्ही खुडिलें विलोल
सभक्ति देवाचरणीं बसेल
हे फूल हा हा ! प्रभुनें खुडून
या आमच्या पायिं दिलें त्यजून

तें फूल पायीं लव लागलेलें
विटाळलेलें प्रभुला न चाले
हें फूल पायींच समाज लोटी
देवा, तुझ्या हें परि लावि पोटीं

इंदूर. १९२८. ]                                                    [ यशवंत १९२८

## २५–अभागी अर्भकास— ... ... [ मनमोहन ]

मुखचन्द्र लाडक्या, तुझा एकदां बघुं दे नेत्र भरून् ॥ ध्रु. ॥

शून्य वसती सर्वथा ही
शांत दाही या दिशाही
ही मध्यरात्रही उलटुन गेली, गेली सृष्टि निजून् ॥

दाटला काळोख फार
विश्व वाटे जणु भुयार–
ज्यामधें आपलें पाप मला ये ठेवाया दडपून् ॥

या अशा एकांत जागीं
जोंवरी तूं–मीच जागीं
तोंवरी राजसा, चिमण्या माझ्या, बघुं द तुज निरखून् ॥

कोवळें हें अंग सान
रेशमाहुन मृदुल छान
जावळावरुन या हात फिरवतां येई ऊर भरून् ॥

काय बघती बाइ, डोळे
बघुनि माझें चित्त डोले !
पाहून लाल ही इवली जिवणी ये पान्हाच फुटून् ॥

विषघटीं ना अमृत राही
मधुफळें नच कुचलियाही
निष्पाप असें मग मत्पापाला फळ ये कैंवि कुठून् ?

फेर नशिबाचाच उलटा
कीं जगीं मी होइ कुलटा
अन् प्रेमाचा हा पाशहि झाला शाप मला उलटून् ॥

फिरफिरुनि चुंबीन माझा
तान्हुला लडिवाळ राजा
बिनघोर घोरुं दे घोर राक्षसी जनतारूप अजून् ॥

.. .. .. .. ..

माय ती चुंबून गाला
लावि जों वक्षास बाळा
तों लागलीच चाहूल कुणाची, ये कांटा थरकून् ॥

ओढि दुबळी आंत प्रीती
नी प्रबळ बाहेर नीती
मातेस धैर्य ये हाय, कराया निजबाळाचा खून् ॥

इंदूर. }
२८-१-३९ }

{ ज्योत्स्ना.
{ आगस्ट १९३९.

## २६—कृषिक-कन्येस— … … … [ केशवकरणी ]

दूर निळया त्या डोगररांगा समोंवार घेरिती
तुझा गे गड हा अवघड किती !

समृद्ध शेतें, भरलें गोपुर, फळली बागाइत
तुझें हें राज्य खरें सुघटित ।

निबिड तरुवरी मञ्जुळ करिती कूजन हे द्विजगण
चतुर हे तुझेच बन्दीजन ।

आणि पांखरें हाकित गोफण फिरवितेस गरगरां
फिरे तव राजदण्ड हा खरा !

चमचम करितीं किति हीं पिवळीं पिकलीं कणसें, अहा !
विपुल हें सोनें भरलें पहा ।

सवत्स गाई, डौलदार हे बैल, समुन्नत म्हशी
सुखाची साक्ष पटविती अशी ।

वर नीलाम्बर हें छत्र तुझें सुंदर
तुजपुढें नम्र हे तरु ढाळिति चामर
क्षाळितो भक्तिनें चरण तुझे निर्झर !

यापरि सजणे, इथें नान्दसी सुखांत रानीं जशी—
महालीं नसेल राणी तशी !

कन्नोद. } { श्री
८-७-३६ } { १९३६,

## २७—मालव—कृषिबालेस— ... [ सुन्दर यादव ]

मालवकृषिबाले, साजणे, मालवकृषिबाले
रानफुलापरि साजतेस, तुज पाहुन मन धालें !

लाल भडक साडी, तुझी गे, लाल भडक साडी
तसाच परकर, कास घातली, खास न या जोडी !

बोर शिरीं नाचे, चञ्चले, बोर शिरीं नाचे
पायिं कडें, कीं गडे, जडे हें मानस कवणाचें !

गळा सरी भारी, रुप्याची, गळा सरी भारी
चन्द्रकोर जणुं शिवास सोडुन तुलाच मिठि मारी !

ती दिसते राई, बाजुला, ती दिसते राई
गाव तुझें त्याजवळ, तिकडुनी हा ओढा जाई

तें दिसे पसरलें दूरवरी इन्दुर
ही सान टेकडी राहूची सुन्दर
तो विन्ध्याचल डोकावे क्षितिजावर

तुझ्याच रङ्गाची, सावळे, तुझ्याच रङ्गाची
आटपाट मैदानी भरली छबि या शेतांची

हिरवें घनदाट, पसरलें, हिरवें घनदाट
अहा, गव्हाचें शेत करी हें पाचूवर मात !

आणिक माझारीं, लाविला, त्याच्या माझारीं
मधें कुठकुठें कसा हरबरा झाक निळी मारी !

जागोजाग कशी, साजिरी, जागोजाग कशी
फुलली अळशी, जणु नवलाची काढिलि कुणि नकशी

उभी गात गाणें, त्यात तूं, उभी गात गाणें
गमे अन्नपूर्णाच पातली तुझिया रूपानें !

शान्तीस्तव आम्ही झुन्ज खेळतों बळें
जगण्यास्तव करितों मृत्यूचे पथ खुले
बन्धुत्व राखितों चरचर कापुन गळे !

परि तुज भवतालें, साजणे, बघ तुज भवतालें
स्वयम् शान्ति, सुख, सख्य ठाकलीं नम्र करून भाळें !

इंदूर.

## २८–सान्ज झाली– ... .. ... [ दिण्डी ]

सान्ज झाली, सम्पला दिवस सारा
परत आलीं हीं पाखरें भरारा

हळूं वळलीं गोठ्यास गुरें दूर
सुटुनि गिरणीतुन निघाले मजूर

सान्ज झाली, चालला रवी वेगें
पश्चिमेची जणुं ओढ तया लागे

मनीं प्रेमातुर होइ हा मजूर
प्रेयसीच्या स्मरणात दिसे चूर

सान्ज झाली, तारका नभीं हासे
फूल फुललें, प्रीतीच कीं विकासे

मजूराच्याही हृदयिं फुले प्रीती
वेध लागे रमणिचा तयाचित्तीं

सान्ज झाली, नभि छटा लाल आली
जणू लाजेचा साज दिशा ल्याली

बघुन छबि ती मनिं बोलला मजूर
"मत्सखीचा हा काय असे नूर?"

सान्ज झाली विश्रामधाम आलें
सखिस बघुनी तो मनि मजूर डोले
तीच जीवन—सर्वस्व सार तीच—
तीच आशा—आधार एक तीच !

"सखे ये ये" हे म्हणत लाडकीला
नेत ओठीं तो ओढि अन्तराळा
प्रणयगंगा ती तधीं रक्तरङ्गा
प्रिया प्यालातिल चढत जाइ रङ्गा

चढवि एकावर एक तोहि प्याला
किती प्याला ठाऊक तें न त्याला
पुरी प्रेमाची समाधीच झाली !
सान्ज सरली नी घोर निशा आली !

इंदूर
२५-७-३९.

मनोहर
डिसेंबर १९३९.

## २९–प्रतीक्षा– ... ... ... [ शा. वि. ]

“आहा, नौकरिचा पगार पहिला येणें असें आजला
‘येतो सान्जघडीस मी बघ’ असें सांगून गेले मला

गेला मावळुनी कधींच दिन, या झाल्याहि सान्जा तिन्ही
ते येती परि कां अजून न, जरी झाली दिवेलागणी ?

“केंव्हांची तरी चूल पेटवुन ही मी बैसलें तिष्ठत
ताजी भाकर चांगली करून कीं वाढीन त्यांना झट

खाऊ काय जिऊ–शिवूस तरि हे घेण्या कुठे थांबले ?
हौसेचें बघण्यात बाइ, लुगडें कीं एवढे गुन्तले ?

“हीं पोरें हुरहुरलींच अगदीं, त्यांना किती थांबवूं ?
हाका मारित ही बसे जिउ, करी हा येरझारा शिवू

ही झाली घटका वरी, नि इतका अन्धार झाला तरी—
कां येती न बरें ? उशीर न बरा हा बाइ, येण्या घरीं

“हा सैंपाक करून पान कधिंचें हें मांडुनी ठेवलें
त्यांवाचून न घेति घासहि जरी झालीं भुकेलीं मुलें

केंव्हांची आशि या कडींत पाळि मीं घालून ही ठेवली
केंव्हांची तरि ही वहाण करूनी मी पालथी टाकली

"हीं सारीं बसल्या ठिकाणिंच मुलें तेशींच हो झोपलीं !
गेलें अन्न निवून, चूल विझली, मी बैसलें एकली

येती ना परि हे अजून न कळे कां ? जीव हा ओढ घे
हे झाले किति ? मोजतेच-अकरा का हे ?—अगे बाइ गे !

"दारीं चाहुल लागते परि-अहा, पाऊल त्यांचें खरें !
हा दैवा—पण—धाडधाड कसला आवाज झाला बरें ?"

.. .. .. .. ..

हाताशीं दिवटी धरून बघण्या गेली झणीं जों पुढें
तों बेफाम दिसे धनी पसरला झिङ्गून दारामधें !

त्याला सावरण्या तशीच सहसा जों धावली तातडी
"आई—आइ !" म्हणून तीच पडली तों धाडकन् बापडी

तो राहून उभा कसातरि, तिला लाथाडुनी गर्जला—
"र—ऱ्—री—ण्—"

—परि राहिलीच नव्हती शुद्धी जराही तिला !!

कन्नोद
२४-९-३७.

मनोहर.
जानेवारी १९३८,

## ३०–रानचा मेवा- ... ...[वियद्गङ्गा]

‘अहो, घ्या रानचा मेवा, दिला दिड्कीस हा दादा !’
समोरीं वन्यकन्या ही कुणी घाली अशा सादा ।
उभी द्रोणात मोठालीं भरोनी भोर कर्वन्दें
टपोरे त्याहुनी डोळे तिचे, तो भावही साधा ।

नव्या नीलाब्ज रंगाची छवी साची तदङ्गाची
धरी त्या रानमेव्याशीं न हो कांहीं विसंवादा ।
कटी पट्कूर नी विट्कीच अंगीं फाटकी चोळी
परी निर्दोष कायेला शिवेना लेशही बाधा !

किती निष्पाप तूं बाळे, गडे सह्याद्रिवेल्हाळे,
न या आनन्द वृत्तीला मुळीं माहीत मर्यादा ।
गमे कीं त्वन्मिषें एथें जनीं त्या निर्जनातून
मजेने डोङ्गरी हा ओघ हिण्डे स्वैर एखादा ।

दरीखोरात सह्याच्या कुठेसें झोपडें तूझें
तुझें हें हास्य गे, माझ्या हसे उत्तुंग प्रासादा !
तुझ्या थोड्या तहानेला पुरे ही गोड कर्वन्दें
फुकाच्या दीर्घतृष्णेची मला जाची सदा बाधा !

दिला दिड्कीस हा मेवा, मला अन्मोल गे, व्हावा—
सुखाचा धन्य तो ठेवा, तुझा सन्तोष जो साधा !

इंदूर. ६-३-१९३९ ] [ ज्योत्स्ना, एप्रिल १९३९

## ३१–आम्बराई– ... ... ... [मेनका]

आम्बराई ही पहा कैशी चिकार् !
या ठिकाणीं जाणवे ना ही दुपार्

रखरख हें ऊन बाहेरीं कसें ?
हा परी छायाळ एथें अन्धकार्

हा उन्हाळा ऐन वैशाखातला
वर्षतो अग्नीच वाटे चोंहिवार्

हाय, होई काय हो ही काहिली ?
या इथें शिम्ला परन्तु थण्डगार् !

केवि फान्द्यांचा वरी हा माण्डव
नी कशीं हीं गर्द पानें बेसुमार् !

लोंबला हा खालतीं आम्ब्रा किती
या फळांचा साहवे ना त्यास भार्

गोड येई शब्द मोटेचा कसा
गावया ये कोकिळेला ऊत फार्

ही भुई नुस्ती तरी वाटे बरी
मी जरा एथेंच माथा टेकणार्

टाकतां हे अङ्ग निद्रा लोटली
लाम्ब जाण हा नुरे आतां विचार्

इंदूर. १ मे १९३९ ] [ ज्योत्स्ना, जून १९३९.

## ३२—पावा— ... .. ... [ मञ्जुघोषा ]

वाजताहे हा कुठें मञ्जूळ पावा ?
सूर हा वाटे जसा बुल्बूल गावा !
  सूर ?—छे हो, ही उशी वाटे परांची
  स्वर्ग कोठें याहुनी दूजा असावा ?
रम्य ही पुष्पापरी ऐशी सकाळ
अन् लकेरी भैरवीची गोड, वा वा !
  बासरी ही ओठभेटीची भुकेली .
  आळवीते श्रीहरीचा काय धावा ?
शोधुनी मी पाहतां कोणी दिसेना
कोठुनी वेणूसुधेचा ओघ यावा ?
  वाटतें या बासरीचा जादुगार - -
  कोण तूं तो एकदां डोळां बघावा
सांगतो कीं प्रीति या दों डोळियांची
छे, गुणाला हा नसे निर्बन्ध ठावा
  पाहिलें ना मीं तुला नी तूं मलाही
  वाढवीसी तूं परंतू स्नेहभावा
हें कळो किंवा कळो ना हें मला कीं
वाजताहे हा कुठें मञ्जूळ पावा
  धन्य यातें आठवीतां खिन्न ऐशा
  चित्तिं माझ्या गोड प्रातःकाळ व्हावा !

इंदूर. १३-१०-४०. ]

## ३३-निश्शब्द कथन— ... .. [सुनीत]

आहे विन्ध्य अविन्ध्य सन्निध उभा भिन्तीपरी हा पुढें
नी एकावर एक घाटवळणें हीं नागमोडी अशीं

केंवी सुन्दर सागरान पसरे हें गर्द चोंहीकडे
देती सान्ज उन्हें मलूल पिवळी ताम्बूस शोभा कशी!

विन्ध्याचें जणुं खोल हें हृदय, ही ऐशी दरी खालतें
तीतूनी अतिरम्य घेत वळसे अज्ञार ही चालली

वाटे, या जळिं पाय सोडुन सखीसंगें बसावें इथें
वेचावींत खुशाल बाळ बनुनी वाळूत वा शिम्पलीं!

येथें काम नसे, न काळजि, न ती घाई, न वा घर्घर
येथें केवळ शांतताच विलसे, आलेख्यवत् सर्वच!

हें सौंदर्य विलोकितां स्मरतसे विख्यात तो टर्नर!
झालें मी तर मुग्ध! नी उमटले माझ्या मनीं हे वच—

रे, ठावेंच न, सापडेहि न तुझ्या शब्दांत जें पण्डिता
ऐसें कांहितरी कथील तुजला ही स्तब्ध निश्शब्दता!

इंदूर
२९-८-३९.

ज्योत्स्ना (दिवाळी अंक)
नोव्हेंबर १९३९.

## ३४–निर्विकार पाषाण– ... .. [ शा. वि. ]

झाली देवकृपा, नभातुनि सुधाबिन्दू गळूं लागले
ते झेलून गळीं विहंगम करी सूरा सुरू आपले
त्या त्या रंगिं तनूवरी फुलवुनी थाटांत नाना फलें
वेलींनी मृदु इन्द्रचाप भुवनीं वाटे दुजें निर्मिलें !
आणी शाल विशाल गार हिरवी वृक्षें नवी लेउनी
मोत्यांनीं किति आणली स्वतनुला शोभा मनोहारिणी
पान्थाची जुळलीच अञ्जलि पुढें दों घोट ते प्यावया
स्वात्मा थण्ड करून मार्ग धरिला त्यानें हळूं आपला !
पाषाणावरि वर्षला घन, परी तो ना हसे, ना फुले,
राही निश्चल निर्विकार ! विरलें पाणी कुठें ना कळे
तें पाहून कुणी विषाद धरुनी देवा वदे निन्दुनी
"त्याचें काय तया ? खरा दगड !" हें कोणी वदे हासुनी
आला तोंच निदाघ दारुण, गमे अंगारवत् भूतल !
टाकी प्राण विहङ्ग ! कण्ठ सुकतां हो पान्थही विव्हल !
गेली वेलि जळून ! कण्ठ सुकला ! पानें फुलें वाळलीं !
पाण्यावाचुन हायहाय पसरे, ना जीविताशा मुळीं !
केले यज्ञजपादि, देव लवही नाहीं परी तोषला !
त्याचाही करुणाब्धि सम्प्रति गमे तीव्रातपें आटला !
तेव्हां फोडुनि हृत्कपाट झरवी पाषाण धारावती
वेली, वृक्ष, विहंग, पान्थ पिउनी पीयूष तें वांचती !

इंदूर १९३५ ] [ प्रतिभा, अंक १७वा सप्टेंबर १९३५

## ३५—काळा कोळसा— ... ... [शालिनी]

आहे काळा कोळसा हा जरी मी
या रङ्गला हो, हसावें न तुम्ही

तुम्ही सारे गोरटे मीच काळा
याचें येतें काय हासूं तुम्हाला ?

माझा काळा हा उगाळा न रङ्ग
देखा माझे चोखंट अंतरङ्ग

आहे काळें हें न मालिन्य माझें
माझें कीं हो हें तपस्तेज साजे

थंडी, वारे, ऊन, पाऊस यांशीं
धैर्यानें मी खेळलों झुन्ज खाशी !

गारांचाही साहिला तीव्र मारा
कष्टें ऐशा वाकला देह सारा।

माझ्या माथीं पातला हो कुठार
धैर्यानें मी झेलले सर्व वार !

माझे झाले कोटिशः खण्डखण्ड
राही माझें सत्व साचें अखण्ड।

मी केला हो, अग्निकुण्ड–प्रवेश
नाहीं किंचित् वाटला भीतिलेश !

ऐशी आहे घोर माझी तपस्या
सांगा, व्हावें केविं मी पात्र हास्या ?

माझें मातें तत्त्व हें एक ठावें
निस्स्वार्थित्वें कीं जळावें जळावें

जाळोनी हा देह माझा मजेंत
तुम्हाला मी ठेवतों ना उबेंत ?

तुम्हासाठीं राख व्हावी जळून
आहे चित्तीं हाच हेतू अजून

माझा काळा निन्दितां काय वर्ण ?
माझ्या तापें शुद्धि पावे सुवर्ण !

इंदूर
नोवेंबर १९४०

ज्योत्स्ना
डिसेंबर १९४०.

## ३६—नावडता वड— ... ... [ देवद्वार ]

उभा दूरवरी वड हा एकटा
वाटे नावडता सर्व जगा।

अमङ्गळ कान्ती, कळकट कळा
पहातां सकळां येई वीट।

अवघा अवजड शरीर विस्तार
अस्ताव्यस्त भार पारम्ब्यांचा

ओबडधोबड अष्टांग वाकडें
स्वरूप बोंगाडें सोंगापरी।

रंगेल रंगवी जगाला वसन्त
त्यास हा पसन्त वाटेचीना।

आम्रमंजरीची भुकेली कोकिळा
देई ना हाकेला याच्या स्कन्धीं।

प्रिय वेणुकुञ्ज प्रेमियांचें मोठें
ऐसें भाग्य कोठें बापड्याचें ?

अशोक, बकुळी, यांचे जे डोहाळे
ते सुखसोहाळे नाहीं याचे।

मोगरा, मालती, गुलाब, शेवन्ती
यांची ना श्रीमन्ती या गरीबा।

रसाळ माधुरी यास आंब्याची ना
नाहींच चन्दनापरी वास।

यास नाहीं दिल्या माञ्जिऱ्या मोहोर
नाहीं मनोहर कळ्या फुलें।

देवास कोठल्या तरी आवडेल—
बोजड, बेडौल पान याचें ?

ऐका नवल परी! —याच पानांवरी—
तरला श्रीहरी प्रळयांत!!

इंदूर
१३-१२-३९

ज्योत्स्ना (दिवाळी अंक)
नोवेंबर १९४०.

## ३७ सत्प्रीती— ... ... [ पुष्पिता ]

हें दाट हरित तृण वाढे । सत्प्रीती यापरी ॥ ध्रु० ॥

ना कळे बीज ये कुठुनी
ठावें न लाविलें कोणीं
प्रभु घाली जीवन दारी । सत्प्रीती यापरी ॥

नच आड न कुम्पण व्हावें
नच कसलें रक्षण ठावें
देवास काळजी सारी । सत्प्रीती यापरी ॥

स्थळ–काळ–भेद नच ठावा
तिळ मिळे जिथें ओलावा—
धरि मूळ तयामाझारीं । सत्प्रीती यापरी ॥

अतिक्षुद्र गणुनि धिक्कारें
जग तुडविल—तुडवो सारें
परि यास न चिन्ता भारी । सत्प्रीती यापरी ॥

उपटाच खुडा, खुरडाही
चुरडाच, शस्त्र घ्या कांहीं—
नाशितां स्फुरे माघारीं । सत्प्रीती यापरी ॥

कणोद. } २०-११-३६ }

{ महाराष्ट्र शारदा { मे १९३८

## ३८–तारकेस– ... ... . ... [ सुनीत ]

कोहीनूर हिऱ्यापरी चमकता सायन्तनी तारके
पाहोनी तुज कौतुकोनि खिळनी मन्नेत्र हे सारखे

तूं गे कोण अशी बरें ? रजनिच्या का हार्तिची दीपिका ?
कीं हा उज्वल रत्नदीप उजळे आहा, कुणी यक्ष का ?

ही रूपें तुझिया सभक्ति अथवा स्वर्गीय योषा कुणी
ठेवी मङ्गल साञ्जवातच खरी देवापुढें लाउनी ?

कीं गन्धर्व-सुरादि जे विचरती विश्रब्ध कोणी वरी—
त्यांना दाखविसी प्रकाश तिमिरीं आकाशमार्गावरी ?

हें आकाश अफाट सागर जणू-त्या अंतरीं तेवसी—
तूं स्वर्भूमिसमीप दीपगृह कीं तेजाळ ऐशा निशीं ?

गे तूं कोण ? कुणीहि ऐस-परि हा काळोख जो दाटला--
माझ्या मार्गि कभिन्न तो न हरतां येईल केव्हां तुला !

ही ज्योती करिं माझिया मिणमिणे जी, ती चळो ना कधीं
अन्धारातुन तीच वाट उजळे मत्पावलांसन्निधीं !

कशोद
१३-६-३७

मनोहर.
१९३७

## ३९-लोखण्ड नी लाकूड- ... [ दिण्डी ]

काष्ट आणी लोखंड दैवयोगें
सहज आले एकदां एक जागे

लोह वदलें " मम सत्व पहा मोठें
क्षुद्र लाकुड तूं तव बिशाद कोठें !

" मीच राष्ट्रांच्या जिंकितो लढाया
मीच वीरांच्या चालवी बढाया !

तुला तोडिन, फोडीन पर्वतांही
असें माझें सामर्थ्य थोर पाही ! "

काष्ठ बोले " हें खरें रे, परन्तू—
सांगतो इतकें, क्षमा कर, गड्या तूं—

बळापुढतीं लवतोस हवा तैसा,
भंगतों मी, वाकतो कधिं न ऐसा ! "

इंदूर
१३-११-४०.

होळकर कॉलेज त्रैमासिक.
ज्युबिली अंक फेब्रु. १९४१.

## ४०—वादळ— ... ... ... [मुक्तछन्द]

सावध व्हा रे !
जोराचें उठलें भीषण वादळ
चोंहींकडून भयानक आहे सुटला वारा
सूं सूं सान्धीतून, सों सों पानातून—
भरारतो आहे, गरारतो आहे
दिशादिशांतून खवळतो आहे—
महाप्रचण्ड वाऱ्याचा समुद्र !
काय हें वाऱ्याचें विक्राळरूप !
थरारतो अङ्गीं भीतीनें कांटा !
मूर्तिमन्त हा महाभैरव ताण्डवरत !

* * * *

साम्भाळा ! हा आला कल्लोळ वाऱ्याचा,
घरात दडती बापडे म्हातारे
ओढती मागें मुलाबाळांना
म्हणती “ बाळांनों, आंत या आंत—
—लागेल वारें— होईल पडसें— ”
त्यांना कां ओढता ?
तुम्ही क्षीणकाय— भीती तुम्हाला—
चार भिन्तींत कोण्डून घ्या तुम्ही—
आणी कोपऱ्यांत बसा करून अंगाच गाठोडें

गडगडाट मेघांचा होतां—
घालून बसा कानांत बोटें
चमकतां वीज डोळे घ्या झाकून
येतां जोराचा वाऱ्याचा झोत--
टाका घालून दारांना कड्या—
आणी हादरतां कालारूं खोपट
——आठवा राम——आळवा देवाला !
परन्तु बाहेर बागडायला
पोरें हीं अगदीं अधीर झालीं
—अरे भेकडांनों, सोडा ना त्यांना--
जाऊ द्या जरा खुल्या मैदानात
जाणारच तीं——नाहीं ऐकणार——
त्यांना बोलवितो आहे ना त्यांचा सखा मारुत ?
--खचित त्यांचा एकच आत्मा—
तीं पहा बाहेर निघालीं पोरें
ती पहा घार—तोलून पंख वर चालली
सांगा— यांना कोण अडविणार ?
कोणाची आहे वाऱ्यावर सत्ता ?
वहाणार हा—वहात जाणार !
जीर्ण जुनें जें जें मोडकळीला आलें असें तें तें—
सारें मोडणार !

.. .. .. .. ..

नहमीचा तो कोठें मन्दगामी मलयपवन ?
कोठें आहे तो ? –
—वाळ्याच्या विंझणें आन्दोळणारा—
—स्वच्छन्द मौजेनें रेंगाळणारा—
—अर्धपरिस्फुट गुलाबकळी—
—अंगुलिस्पर्शानें उमलविणारा—
—वेणूकुन्जात-लपूनछपून
- प्रीतीची शीळ वाजविणारा –
कोठें आहे तो धीर समीर ? –
—गोड गुदगुल्या अंगाला करून—
—पञ्चशराला जागविणारा—
—नवयुवतीशीं लगटणारा—
—त्यांच्या केसांच्या कुरळ्या बटा उडविणारा—
—त्यांच्या मांसल गालावरचे –
—स्वेदबिन्दु हळूं चाटून जाणारा—
—लीलेनें त्यांच्या उरोजावरून—
—पदर दूर सरकविणारा—
—कोठें आहे तो विलासी वायू ?

+ + + +

करतो आहे हा आज दाण्डगाई
आला आहे याला विलक्षण जोर
भेटेल त्याच्याशीं करतो आहे—

कशी धिंगामस्ती--जसा मत्त हत्ती
हालवितो आहे विशाल तरू
ओढतो त्यांचे मोठाले बुंधे
कडाकड बघा मोडतो आहे—
सहस्रभुजा शाखारूपिणी !
तो पहा पिम्पळ कोलमडला पाराखालतीं—
—पलीकडे-तो ढासळला वड—
जीर्ण कोटाचा तुटता आधार
आजवरी यांना पूजीत आले
भाविक जन, नी भोळ्या बायका
वर्षानुवर्षे-युगानुयुगें—
बसले होते हे ठाण माण्डून—
जटिल आपलें पाळे मुळें आंत
रुतवून खोल भुईच्या पोटांत
( धर्मनीतीचीं जुनीं कुजकीं तत्वेंच म्हणा तीं ! )
पण आतां हे निश्चेष्ट पडले निष्प्राण होऊन
संग्रामात जणूं ठार मारले हे अजस्र असुर—
कोणा देवेन्द्रानें !

* * * *

आणखी पहा—
क्षणापूर्वींच सर्वत्र सुस्थिर शांतता होती
इन्द्रनीळमणिसन्निभ होतें नभोमण्डळ

जणूं प्रसन्न मुखमण्डल—
तें शान्ताकार भगवन्ताचें !
डोलत होते आनन्दें वृक्ष—
हिन्दोळत होतीं वेलीवर फुलें—
वहात होतीं आळसानें नदी—
आठवण ये त्या कव्युक्तिची—
'देव नान्दे स्वर्गी-सारें सुरळित जग चाललें'

* * *

सहसा सारें-गेलें पालटून—
आकाशभर दाटले काळेकभिन्न घन
करणार हे गर्जुन वर्षुन प्रळय खास !
कोठें गेली ती क्षणापूर्वीची—
निष्कंप, निश्शब्द, सम्पूर्ण शान्तता ?
शांतीचें स्थान हें जें आकाश—
त्याची झाली पहा संग्रामभूमी विक्राळ मेघांची !
आतां तेथें चाले कडकडाट विद्युत्-खड्गांचा—
ज्यांची चन्देरी पातीं तळपतां—
दिपतात डोळे—आणी भीतीनें गोठतें काळीज !
अहो, कुठें तो देदीप्यमान, चण्डप्रताप भास्करराज ?
दडला बापडा !
काळी ठिक्कर पडली त्याची सोनेरी आभा !
आणी कोठें तो तारांचा नाथ ? —विलासी गडी—

--विलासासाठींच वाटे जन्म ज्याचा--
काय गत त्याची ? कोण पुसे त्याला ?
ताडे लपविलें त्यानेंही कोठें !
साराच अन्धार !
जिकडे तिकडे उलथापालथ !

*           *           *           *

काय चमत्कार !
आजवरीं ज्यांना निश्शंकपणें
तुम्ही तुडविलें पायांखालतीं
निर्दयपणें टाचेनें काढून--
तुम्ही ज्यांची केली राईपेक्षांही बारीक पूड
मातीहून माती !—
तेच धूलीकण उचलून हा—
पतित पावन मारुतराय—
नेतो आहे वरीं आकाश भेटीं !
दाही दिशा केल्या यानें धूलिमय !
अहो, या धुळींत यानें लक्षावधीं बीजें विखुरलीं !
मिळतां जीवन-तत्काळ तींच घेतील जीवन !
आणिक त्यांच्या दाट अंकुरांनीं
होईल धरणी माय रोमांचित !